पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था स्तरावर मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल योजनेचे संनियंत्रण, पर्यवेक्षण व समन्वयन करण्यासाठी उपलब्ध अधिकारी/कर्मचारी यांच्याकडून कामे पार पाडण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन आदेश क्रमांकः आस्था-०३१७/प्र.क्र.३४/२०१७/पापु-२५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४००००१
तारीख: २१ मार्च, २०१७.

वाचा :

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६.

प्रस्तावना :

राज्यातील ग्रामीण भागातील जनतेला स्वच्छ व पुरेसे पाणी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने राज्य शासनाने सर्वसमावेशक असा ग्रामीण पाणी पुरवठयाकरिता मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम सुरु केला आहे.

२. उपरोक्त संदर्भात नमूद केलेल्या शासन निर्णयामध्ये "मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमाचे संनियंत्रण, पर्यवेक्षण व समन्वयन संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्यामार्फत करण्यात येईल. यासाठी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था स्तरावर ग्रामीण पाणी पुरवठा संनियंत्रण व व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यात येईल. या कक्षाची रुपरेषा स्वतंत्र शासन निर्णयान्वये विहित करण्यात येईल" असे नमूद केले आहे.

३. त्या अनुषंगाने मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या संनियंत्रणाकरिता स्वतंत्र कक्ष स्थापन न करता योजनेच्या अंमलबजावणी दरम्यान गरजेनुरुप भविष्यात कक्ष स्थापन करण्यात येईल. मात्र सद्यस्थितीत मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या संनियंत्रण, पर्यवेक्षण व समन्वयनाकरिता पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था स्तरावर यंत्रणा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने पुढील आदेश देण्यात येत आहे.

**शासन आदेश:**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल योजनेचे संनियंत्रण व मुल्यमापनासाठी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था स्तरावर ०१ शाखा अभियंता व ०१ डेटा एन्ट्री ऑपरेटर इतका कर्मचारी वर्ग नियुक्त करण्यात येत आहे.

१. निधी

सदर ०१ शाखा अभियंता व ०१ डेटा एन्ट्री ऑपरेटर यांचे वेतन व भत्ते तसेच मुख्यमंत्री ग्रामीण

योजनेचे संनियंत्रण व मूल्यमापन करण्यासाठी होणारा अनुषंगीक खर्च पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेस मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल योजनेअंतर्गत प्राप्त सहाय्य निधीतून करण्यात येईल.

२. स्वतंत्र बँक खाते

पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था स्तरावर राष्ट्रीयकृत बँकेत एक स्वतंत्र बँक खाते उघडण्यात येईल. याबाबत आहरण व संवितरण अधिकारी संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था हे राहतील. त्यावर संनियंत्रण मुख्य अभियंता तथा विशेष कार्यकारी अधिकारी (कार्यासन पापु-१९) यांचे राहील.

३. लेखाविषयक बाबी

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल योजनेअंतर्गत पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेस प्राप्त निधीचे लेखाविषयक सर्व कामकाज लेखाधिकारी,(राष्ट्रीय ग्रामीण पेयजल योजना) हे पाहतील.

४. संनियंत्रण

सदर कर्मचाऱ्यांवर मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल योजनेबाबतच्या कामकाजाबाबतचे संनियंत्रण संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था व मुख्य अभियंता तथा विशेष कार्यकारी अधिकारी (कार्यासन पापु-१९) यांचे राहील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२०१२३३२३१७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajashree Rahul Sarang

Digitally signed by Rajashree Rahul Sarang
Date: 2017.03.21 14:28:09 +05'30'

**(राजश्री रा.सारंग)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई.

२. विशेष कार्यकारी अधिकारी तथा मुख्य अभियंता पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

३. उप सचिव, (सर्व) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.

४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.

५. विभागीय आयुक्त (सर्व)

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

७. संचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.

८. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई.

९. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)

१०.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)

११. मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.

१२. अधीक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.

१३.कार्यकारी अभियंता (सर्व), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)

१४. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.

१५. निवड नस्ती, कार्यासन (पापु-२५)